**प्रधानमंत्री ग्रामसडक योजना भाग-३ अंतर्गत पॅकेज क्रमांक MH-२९१३२ मधील गिरझणी ते संग्रामनगर रस्ता ता. माळशिरस, जिल्हा-सोलापूर या रस्त्याच्या कामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रासयो-२०२३/प्र.क्र.४२९/बांधकाम-२**
**मंत्रालय, बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,**
**फोर्ट, मुंबई-४०० ००१**
**तारीख: १५ मार्च, २०२३**

**वाचा:-**

१) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः PMGSY-2021/C.R.86/Bandhkam-2, Date 20.08.2021
२) मुख्य अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांचे पत्र क्र. मु.अ. /प्रमंग्रासयो/ ४५८५/२०२३ दिनांक ०८.११.२०२३

**प्रस्तावना:-**

प्रधानमंत्री ग्रामसडक योजना भाग-३ अंतर्गत पॅकेज क्रमांक MH-२९१३२ मधील गिरझणी ते संग्रामनगर रस्ता, ता.माळशिरस, जिल्हा-सोलापूर या रस्त्याच्या कामासाठी संदर्भ क्र. १ येथील दिनांक २०.०८.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये रू.२५५.६१ लक्ष इतक्या किंमतीच्या कामास व ०५ वर्ष देखभाल दुरुस्ती रक्कम रू.१७.४१ लक्ष इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर कामाचा कार्यारंभ आदेश दिनांक २८.१२.२०२१ रोजी देण्यात आलेला आहे.

सदर कामाच्या निविदा व अटीशर्तीनूसार कंत्राटदाराला भाववाढ फरक रक्कम अदा करणे आवश्यक असून भाववाढ फरक रक्कम व त्यामध्ये अंतर्भूत असलेली वस्तू व सेवाकराची किंमत यामूळे कामावर होणारा खर्च हा मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या १० टक्के पेक्षा जास्तीचा होत असल्याने सदर कामाचा सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मुख्य अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, पुणे यांनी संदर्भाधिन क्र.२ येथील पत्रान्वये शासनास सादर केला होता. सदर कामावर एकूण रु.२९१.२६ लक्ष इतका अंतिम खर्च होत असून मंजूर प्रशासकीय मान्यता रकमेच्या १३.९५ टक्के जास्तीचा म्हणजेच प्रशासकीय मान्यता रकमेपेक्षा रु.३५.६५ लक्ष जास्तीचा खर्च होत आहे. वाढीव खर्चामध्ये रॉयल्टी चार्चेस, वस्तू व सेवा कर खर्च, सर्वेक्षण खर्च, भाववाढ फरक इत्यादी बाबींचा समावेश आहे.

केंद्र शासनाच्या दिनांक १२.१०.२०२२ च्या पत्रानुसार वाढीव वस्तू व सेवा कराची किंमत केंद्र शासन व राज्य शासनामध्ये ६०: ४० या प्रमाणात देय राहील. त्यामूळे पॅकेज क्रमांक MH-२९१३२ मधील गिरझणी ते संग्रामनगर रस्ता, ता.माळशिरस, जिल्हा-सोलापूर या रस्त्याच्या कामाच्या किंमतीच्या वाढीव खर्चामध्ये रॉयल्टी चार्जेस, वस्तू व सेवा कर खर्च, सर्वेक्षण खर्च, भाववाढ फरक इत्यादीमुळे वाढ झाल्याने सदर कामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

प्रधानमंत्री ग्रामसडक योजना भाग-३ अंतर्गत पॅकेज क्रमांक MH-२९१३२ मधील गिरझणी ते संग्रामनगर रस्ता, ता.माळशिरस, जिल्हा-सोलापूर या रस्त्याच्या कामांच्या वाढीव खर्चामध्ये रॉयल्टी चार्जेस , वस्तू व सेवा कर खर्च, सर्वेक्षण खर्च, भाववाढ फरक इत्यादी कारणांमूळे किंमतीमध्ये वाढ झाल्याने एकूण रु.२९१.२६ लक्ष इतका अंतिम खर्च होत असून मंजूर प्रशासकीय मान्यता रकमेच्या १३.९५ टक्के जास्तीचा म्हणेजच प्रशासकीय मान्यता रकमेपेक्षा रु.३५.६५ लक्ष जास्तीचा खर्च होत आहे. सदर रु.३५.६५ लक्ष वाढीव खर्चाच्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**(रु.लक्ष मध्ये)**

| पॅकेज क्रमांक | कामाचे नाव | प्रशासकीय मान्यता किंमत | स्वीकृत निविदा रक्कम | सुधारीत खर्च | प्रशासकीय मान्यता रक्कमेपेक्षा अधिकचा खर्च | प्रशासकीय मान्यता रकमेपेक्षा जास्तीच्या खर्चाची टक्केवारी |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. | ७. |
| पॅकेज क्रमांक MH-२९१३२ | गिरझणी ते संग्रामनगर रस्ता, ता.माळशिरस, जिल्हा-सोलापूर | २५५.६१ | २६४.५८ | २९१.२६ (केंद्र शासन हिस्सा-१५८.६८ राज्य शासन हिस्सा-१३२.५८) | ३५.६५ | १३.९५ |

२. उपरोक्त आर्थिक विश्लेषनानुसार काम पूर्ण करावयाचे झाल्यास रु.२९१.२६ लक्ष इतका अंतिम खर्च होत असून, सदर कामाच्या प्रशासकीय मान्यता रक्कमेच्या १३.९५ टक्के जास्तीचा म्हणजेच रु.३५.६५ लक्ष जास्तीचा होत आहे.

३. प्रधानमंत्री ग्रामसडक योजना भाग-३ अंतर्गत पॅकेज क्रमांक MH-२९१३२ मधील गिरझणी ते संग्रामनगर रस्ता, ता.माळशिरस, जिल्हा-सोलापूर या रस्त्याच्या रु.३५.६५ लक्ष इतक्या वाढीव रकमेस खालील नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३.१ सुधारित प्रशासकीय मान्यतेनुसार C-DAC पुणे यांच्या मदतीने OMMAS संगणक प्रणालीमध्ये योग्य ते बदल केले जातील याची दक्षता घेण्यात यावी.

३.२ सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच काम पूर्ण करण्याची दक्षता घ्यावी.

३.३ योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहीत निविदा कार्यपध्दती अनुसरणे, आवश्यकतेनुसार राज्य तांत्रिक सल्लागार समितीचे प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निर्देशांचे पालन करावे व त्रुटींची पूर्तता करावी.

३.४ सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी, निविदा विषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहीत धरली जाणार नाही. अशा प्रकरणाची तपासणी त्यावेळच्या प्रचलित शासन नियमानुसार करण्यात यावी.

४. सदर कामावरील खर्च मागणी क्र. एल-७, ५०५४, प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेअंतर्गत नवीन रस्ते व पूल बांधणी व अस्तित्वातील रस्त्याचे दर्जोन्नतीकरण (कें.पु.यो.) (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम) ५३, मोठी बांधकामे ५०५४ ५२३३ व (केंद्र हिस्सा ६० टक्के) ५०५४ ५२२४ या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१५१०५९३३६७२० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2024.03.15 11:46:58 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद/ विधानसभा, विधानभवन, मुंबई

२. मा. मंत्री, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.

३. सहसचिव (आरसी) व संचालक, राष्ट्रीय ग्रामीण अवसंरचना विकास संस्था (NRIDA), नवी दिल्ली.

४. प्रधान सचिव (ग्रा.वि.व पं.रा.), ग्रामविकास विभाग,मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक

५. संचालक (Technical), राष्ट्रीय ग्रामीण अवसंरचना विकास संस्था (NRIDA), नवी दिल्ली.

६. संचालक (Project-I), राष्ट्रीय ग्रामीण अवसंरचना विकास संस्था (NRIDA), नवी दिल्ली.

७. सचिव, मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, ग्राम विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर.

९. मुख्य अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.

१०.वित्तीय नियंत्रक, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, मंत्रालय, मुंबई.

११.अधीक्षक अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.

१२.कार्यकारी अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, सोलापूर.

१३.आयटी नोडल अधिकारी, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.

१४.कक्ष अधिकारी (कार्यासन बांधकाम-१), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१५.निवडनस्ती (कार्यासन बांधकाम-२), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई